**मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हील) क्र.१८२/२००१ मध्ये दि.४ नोव्हेंबर, २०२२ रोजी दिलेल्या आदेशानुसार सन १९९२-९३ च्या दंगल /बॉम्बस्फोटात बेपत्ता व मृत झालेल्या व्यक्तींच्या अधिकृत वारसांना विलंबाने दिलेल्या मदतीच्या रक्कमेवरील व्याजाची रक्कम मंजूर करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२०२४/प्र.क्र.७९ /म-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २९ मार्च, २०२४.

**वाचा :**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ठराव क्र.आरएलएफ-५९९२/प्र.क्र.२७६/म-३, दि.०८.०७.१९९३
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरएलएफ-४९९७/प्र.क्र.४/म-३ (सेल), दि.२२.०७.१९९८.
३) जिल्हाधिकारी मुंबई उपनगर यांचे पत्र क्र.सी/कार्या-७ड/कावि-wp १८२/२००१/२०२४, दि.२२.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

वर नमूद शासन निर्णय, महसुल व वन विभाग दि.०८ जुलै,१९९३ अन्वये, दि.१२ मार्च, १९९३ व तद्नंतर मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्ह्यांमध्ये झालेल्या बॉम्बस्फोटामधील क्षतीग्रस्तांना द्यावयाच्या मदतीबाबत आदेश देण्यात आले आहेत. त्यानुसार या दंगलीमध्ये मृत पावलेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांना रु.२.०० लक्ष इतके अनुदान राज्य शासनाच्या निधीतून अनुज्ञेय करण्यात आले होते. तसेच वर नमूद शासन निर्णय, महसुल व वन विभाग दि.२२ जुलै,१९९८ अन्वये डिसेंबर,१९९२ व जानेवारी, १९९३ मधील जातीय दंगलीत आणि दि.१२ मार्च, १९९३ च्या मुंबईतील बॉम्ब स्फोटात मुंबई शहर व मुंबई उपनगरातील बेपत्ता झालेल्या व्यक्तींच्या वारसांना/ नातेवाईकांना मुख्यमंत्री सहाय्यता निधीतून रु.१.०० लक्ष व पंतप्रधान सहाय्यता निधीमधून रु.१.०० लक्ष अशारितीने एकूण रु.२.०० लक्ष इतकी मदत अनुज्ञेय करण्यात आली होती.

मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका (सिव्हील) क्रमांक १८२/२००१ मधील दिनांक ४ नोव्हेंबर, २०२२ च्या आदेशान्वये सन १९९२-९३ च्या दंगल / बॉम्बस्फोटात बेपत्ता व मृत झालेल्या व्यक्तींच्या अधिकृत वारसांना शासन निर्णयानुसार मुदतीत मदत वाटप न झालेल्या प्रकरणांत मदतीच्या रक्कमेवर ९% प्रतिवर्ष व्याजदराने मदत वाटप करणेबाबत आदेशित केले आहे. मा. सर्वोच्च न्यायालयाचे दि.०४.११.२०२२ च्या आदेशानुसार दिलेल्या निर्देशांच्या अंमलबजावणीवर लक्ष ठेवण्यासाठी गृह विभागाच्या दि.१९ जुलै, २०२३ च्या आदेशान्वये महाराष्ट्र राज्य विधी व सेवा प्राधिकरणाच्या सदस्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली समितीची स्थापना होऊन निवासी उपजिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांची समिती सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. उक्त समितीने डिसेंबर १९९२ व जानेवारी १९९३ मधील जातीय दंगलीत व दि.१२ मार्च, १९९३ च्या मुंबईतील बॉम्बस्फोटात मृत व बेपत्ता झालेल्या व्यक्तीच्या वारसांना/नजीकच्या नातेवाईकांना द्यावयाच्या मदतीबाबत निर्गमित/प्रलंबित असलेल्या प्रकरणांबाबत वेळोवेळी बैठका आयोजित करुन मृत / बेपत्ता व्यक्तीच्या अधिकृत वारसांना शासन निर्णयानुसार मुदतीत मदत वाटप न झालेल्यांची यादी निश्चित करुन मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हील) क्र. १८२/२००१ च्या संदर्भात दिलेल्या उक्त घटनेमध्ये बाधित झालेल्या व्यक्तीच्या अधिकृत वारसांना मदतीच्या रकमेवर ९% प्रतिवर्ष व्याजदराने मदत वाटप करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्याचे बैठकीत निर्देश दिलेले होते. त्यानुषंगाने जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी विहीत नमुन्यातील एकूण ५५ (४५ मृत व १० बेपत्ता) व्यक्तींबाबतचे प्रस्ताव वर नमूद दि.२२.०३.२०२४ च्या पत्राव्दारे शासनास सादर केले असून याबाबत पुढील आदेश होणेस विनंती केली होती.त्यास अनुसरुन आदेश निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, सन १९९२-९३ च्या दंगल /बॉम्बस्फोटात मृत पावलेल्या ४५ व बेपत्ता झालेल्या १० व्यक्तींच्या वारसांना मदत देण्यासाठी झालेल्या विलंबाच्या दि.३१.०३.२०२४ पर्यंतच्या कालावधीकरिता एकूण रु.३८,९४,०७०/- (अक्षरी रुपये अडतीस लक्ष चौऱ्यान्नव हजार सत्तर फक्त) इतक्या व्याजाचे प्रदान करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.सी-५ -२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण -६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - २००, इतर कार्यक्रम - २०० (०१) (०१), दंगलग्रस्त भागातील झळ पोचलेल्या व्यक्तींना सहाय्य - (२२३५ ०३४७) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व तो उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. या करिता कार्यासन म-३ यांनी लेखाशिर्ष २२३५ ०३४७ अंतर्गत हा निधी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना वितरित करावा.

४. वरील निधी खर्च करताना सर्व संबंधित शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. संदर्भाधीन क्र.५ येथील दि.२७ मार्च, २०२३ च्या शासन निर्णयान्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून द्यावयाच्या मदतीचे सुधारित दर मंजूर करण्यात आले आहेत. या दराने व निकषानुसार २ हेक्टर मर्यादेत मदत प्रदान करण्यासाठी वितरित करण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३३०१५३६०७०७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT,
2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FCF7172A73579B34FA622983D8FB647780FBEF1D35A1CA975955EB9193F3F800, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2024.03.30 15:45:26 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५. वित्तिय सल्लागार व सहसचिव मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
७. कार्यासन अधिकारी (म-११/ब-१), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
९. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).